आदिवासी भागातील आरोग्य विषयांचा अभ्यास करण्यासाठी आणि त्याच्यासाठी उपाययोजना सुचविण्यासाठी राज्यस्तरीय समिती स्थापन करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१६/समन्वय-२
लो.ति.मार्ग, गोकूळदास रूग्णालय संकूल इमारत
१० मजला, मंत्रालय, मुंबई.
दिनांक : २७ मार्च २०२५

प्रस्तावना -

राज्यातील आदिवासी लोकसंख्येचे प्रमाण ९.३५ टक्के असून आदिवासी/ दुर्गम भागात चांगल्या आरोग्य सेवा उपलब्ध करून देण्यासाठी अनेक आव्हाने आहेत. ह्या मध्ये तज्ञ मनुष्यबळाची उपलब्धता, आदिवासी भागात कुपोषण व बालमृत्यू, कमी वजनाची बालके, मलेरीया, डेंग्यू व सिकलसेल ॲनेमिया सारख्या आजारांचे जास्त प्रमाण आढळून येते. तसेच, असंसर्गजन्य आजारांचे उदा. मधुमेह, कॅन्सर इत्यादींचा समावेश आहे.

२. या भागात लोकांचे आरोग्य चांगले राहावे या साठी शासनाचे वेगवेगळे विभाग जसे की, सार्वजनिक आरोग्य विभाग, आदिवासी विकास विभाग, महिला व बाल विकास विभाग, शिक्षण विभाग इत्यादी कार्यरत आहेत. जिल्हा स्तरावर जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, महिला व बाल विकास विभागातील अधिकारी, प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास विभाग हे दैनंदिन ह्या विषयांवर प्रत्यक्ष काम करतात.

३. आदिवासी भागातील बालमृत्यू टाळण्यासाठी उपाययोजना करण्याकरिता मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील विविध विभागांचे सचिव, कार्यालय प्रमुख, स्वयंसेवी संस्थांचे प्रतिनिधी यांचा समावेश असणारी गाभा समिती गठीत करण्यात आली आहे. या व्यवस्थेला सहाय्य करण्याच्या हेतूने आणि आरोग्य सेवेचा एकंदरीत अभ्यास करण्यासाठी आणि येत असलेल्या अडचणी/आव्हाने यांच्यावर उपाययोजना सुचविण्यासाठी राज्य स्तरावर समिती नेमण्याचे शासनाचे विचाराधीन होते.

शासन निर्णय-

आदिवासी भागातील आरोग्य विषयांचा सखोल अभ्यास करण्यासाठी आणि त्याच्यासाठी उपाययोजना सुचविण्यासाठी खालील प्रमाणे राज्यस्तरीय समिती स्थापन करण्यात येत आहे :

१. श्रीमती. मिताली शेठी, जिल्हाधिकारी, नंदुरबार , अध्यक्ष
२. मुरुगणाथन एम. , मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.गोंदिया, सदस्य
३. सुहास लक्ष्मण गाडे, मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.गडचिरोली, सदस्य
४. मिनल करणवाल, मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.जळगाव, सदस्य
५. करिष्मा नायर, प्रकल्प अधिकारी, जव्हार, सदस्य
६. मेघना कवली, प्रकल्प अधिकारी, किनवट, सदस्य
७. अकूनूरी नरेश, प्रकल्प अधिकारी, कळवण, सदस्य
८. प्रविण भावसार, जिल्हा कार्यक्रम अधिकारी, पालघर,सदस्य.
९. कृष्णा राठोड, जिल्हा कार्यक्रम अधिकारी, नंदुरबार, सदस्य
१०. प्रविण पाटील, बाल विकास प्रकल्प अधिकारी, रायगड, सदस्य
११.उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ, नाशिक, सदस्य सचिव.

२. समिती त्यांची कार्यपध्दती स्वतः ठरवतील. समिती आवश्यकतेनुसार आदिवासी जिल्ह्यात भेटी देतील आणि विविध शासकीय विभाग, जनता, खाजगी संस्था/व्यक्ती, एनजीओ, तज्ञ व्यक्ती इत्यादी यांच्याशी चर्चा करतील.

३. वरील समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे राहील .-

१. आदिवासी भागातील आदिवासी जनतेच्या आरोग्याशी निगडीत सर्व बाबी यांचा सखोल व सर्वंकष विश्लेषण करून अभ्यास करणे.
२. आदिवासी जनतेच्या आरोग्यविषयक विश्लेषणाच्या आधारावर उपाययोजना सुचविणे.

४. सदर समितीने आपला अहवाल तीन महिन्यात शासनास सादर करावा.
५. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभाग, महिला व बाल विकास विभाग, महसूल विभाग, ग्राम विकास विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.
६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१३२२२७७९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2025.03.27 13:23:42 +05'30'

**( अ. मा. आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा. उप मुख्यमंत्री व मंत्री (नगर विकास, गृह निर्माण) यांचे प्रधान सचिव
४. मा. उप मुख्यमंत्री व मंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव

५. मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण, मंत्रालय, मुंबई
६. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण, मंत्रालय, मुंबई
७. मा.मंत्री (सर्व), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा.राज्यमंत्री (सर्व), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.विभागीय आयुक्त (सर्व)
११.आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, रा.आ.अ., मुंबई
१२.जिल्हाधिकारी / आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१३.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१४.संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
१५.संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
१६.संचालक, वैद्यकीय शिक्षण विभाग, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
१७.जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालये (सर्व)
१८. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१९.सह संचालक / उप संचालक, आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व)
२०.सर्व कार्यासने, सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय, मुंबई
२१.निवड नस्ती (सम-२)